# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन ज्ञापन क्रमांक पोरुग्णा-०११९/प्र.क्र.७/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०७ जानेवारी २०१९.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिपत्याखालील पोलीस रुग्णालये व दवाखाने यांच्याकरिता १० *"Defibrillator"* यंत्र खरेदी करण्यासाठी रु.११ लक्ष इतक्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**संदर्भ** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-६/(सा.सा.)/२९/२०१८, दिनांक २६.१२.२०१८.

**ज्ञापन.**

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाने पोलीस रुग्णालय, नागपाडा, पोलीस उपरुग्णालय, नायगांव आणि १२ पोलीस दवाखाने व दोन फिरते दवाखाने यांमध्ये हृदयविकाराच्या उपचारासाठी १० *"Defibrillator"* यंत्र खरेदी करण्यासाठी रु.११ लक्ष इतक्या खर्चास मंजूरी मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. त्या अनुसार, पोलीस रुग्णालय, नागपाडा, पोलीस उपरुग्णालय, नायगांव आणि १२ पोलीस दवाखाने व दोन फिरते दवाखाने यांमध्ये हृदयविकाराच्या उपचारासाठी १० *"Defibrillator"* यंत्र खरेदी करण्यासाठी रु.११ लक्ष इतक्या खर्चास, खरेदीसंबंधीच्या नेहमीच्या कार्यपध्दतीबाबतच्या नियमांचे आणि इतर सर्वसाधारण निदेशांचे अनुपालन करण्यात येईल या अटीवर, याद्वारे, मंजूरी देण्यात येत आहे.

३. उक्त खर्च हा *गृह विभाग-मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस, (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०५) रुग्णालयीन खर्च, (०५)(०१) बृहन्मुंबईतील पोलीस रुग्णालये (अनिवार्य) (२०५५ ०१४१), ५२-यंत्रसामग्री व साधनसामग्री*, याखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०१८-१९) उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र. ४५, *(महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५)* नियम १६९, अनुसार प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त असलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०१०७१२४५३४२९२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad011
84493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND
FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI,
serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b
95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL
BORSE
Date: 2019.01.07 12:56:03 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) पोलीस शल्यचिकित्सक, पोलीस रुग्णालय, नागपाडा, मुंबई.
२) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).